दी पिपल्स युनियन फॉर सिव्हील लिबर्टीज यांनी दाखल केलेल्या रिट पिटीशन क्र. २८१५/२००३ संदर्भात मा. मुंबई उच्च न्यायालयाच्या निदेशाचे अनुषंगाने जिल्हा स्तरीय उपसमितीची पुनर्रचन करण्याबाबत

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन शुध्दीपत्रक क्रमांक : एमआयएस-२००४/प्र.क्र.१००/पीआरएस-२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक - ९ सप्टेंबर, २००९.

**वाचा :** - शासन निर्णय क्र. एमआयएस-२००४/प्र.क्र. १००/पीआरएस-२,
दि. २४/९/२००४.

**शुध्दीपत्रक :-**दी पिपल्स युनियन फॉर सिव्हील लिबर्टीज यांनी दाखल केलेल्या रिट पिटीशन क्र. २८१५/२००३ संदर्भात मा. मुंबई उच्च न्यायालयाने जिल्हा स्तरावर उपसमित्या स्थापन करण्याचे निदेश दिले होते. त्यानुसार उक्त शासन निर्णय दि.२४/९/२००४ अन्वये कारागृहातील बंदयांच्या कायदेविषयक सहाय्यक व पुनर्वसनासाठी जिल्हा स्तरावर प्रत्येक जिल्हयात उप समिती गठीत करण्याचा शासनाने निर्णय घेतला होता. तद्नंतर या समितीमध्ये आणखी काही विभाग /क्षेत्रातील सदस्यांचा समावेश व्हावा अशी मागणी करण्यात येत असल्याने सदर समितीची पुनर्रचना करण्याची बाब शासनाचे विचाराधीन होती. त्यानुसार शासन जिल्हा उपसमितीची खालीलप्रमाणे पुनर्रचना करीत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | जिल्हा व सत्र न्यायाधीश | अध्यक्ष |
| २) | जिल्हा पोलीस अधीक्षक | सदस्य |
| ३) | जिल्हा शल्य चिकित्सक | सदस्य |
| ४) | अध्यक्ष, जिल्हा विधी सेवा प्राधिकरण | सदस्य |
| ५) | पोलीस अधीक्षक, लोहमार्ग यांनी प्राधिकृत केलेला अधिकारी | सदस्य |
| ६) | जिल्हा शिक्षण अधिकारी | सदस्य |
| ७) | जिल्हा परिविक्षा अधिकारी (महिला बालकल्याण अधिकारी) | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ८) | आयुक्त, महानगरपालिका/ मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद यांनी प्राधिकृत केलेला अधिकारी | सदस्य |
| ९) | कारागृह क्षेत्रात काम करणा-या सामाजिक संस्थांचा प्रतिनिधी | सदस्य |
| १०) | अधिक्षक, मध्यवर्ती कारागृह/जिल्हा कारागृह | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा :-** "न्याय चौकशी अधिन कैद्यांशी संबंधित प्रश्नांची चर्चा करणे व त्यातून मार्ग काढणे. कैद्यांची ने - आण करण्याकरिता लागणारी पोलीस सुरक्षा, आरोग्य विषयक प्रश्न, महिला कैदी तसेच त्यांचेसोबत असणारी लहान मुले यांचेशी संबंधित प्रश्न, कैद्यांसाठी शिक्षण तसेच व्यवसाय मार्गदर्शन, प्रोबेशन ऑफ ऑफेंडर्स ॲक्ट तसेच ब्रोस्टल स्कुल ॲक्ट या कायदयाची अंमलबजावणी, कैद्यांना पुनर्वसन व इतर प्रश्न या सर्व विषयावर चर्चा करुन त्यातून मार्ग काढणे.

सदर उप समितीची बैठक जिल्हास्तरावर तीन महिन्यापासून एकदा घेण्यात यावी व सदर बैठकीत झालेल्या कार्यवाहीचा अहवाल राज्यस्तरीय समितीस पाठविण्यात यावा.

शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या w.w.w.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सगणक सांकेतांक २००९०९०९१७२१३०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

(टि.वा.करपते)
अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग

एच-१६५२ -१३।

प्रधान सचिव,गृह विभाग (कारागृह)
प्रधान सचिव, महिला व बालकल्याण विभाग
सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग
महासंचालक, आरोग्य सेवा, मुंबई
सर्व उपसंचालक, आरोग्य सेवा, (८)
सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (३४)
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे
सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य कायदेविषयक सहाय्य व सल्ला मंडळ
सर्व जिल्हा व सत्र न्यायाधिश
सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक
सर्व जिल्हा महिला बालविकास अधिकारी
सर्व जिल्हा शल्य चिकित्सक
अध्यक्ष, जिल्हा विधी सेवा प्राधिकरण (सर्व जिल्हे)
सर्व पोलीस अधीक्षक, लोहमार्ग
सर्व जिल्हा शिक्षण अधिकारी
सर्व जिल्हा परिविक्षा अधिकारी, (महिला व बाल कल्याण)
सर्व आयुक्त, महानगरपालिका
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
प्रोजेक्ट डायरेक्टर, प्रमास ९/१, बीडीडी चाळ, वरळी, मुंबई.
सर्व अधीक्षक, मध्यवर्ती/जिल्हा कारागृहे
निवडनस्ती/पीआरएस २

----------